**देहविक्री करणा-या राज्यातील महिला व त्यांच्या सोबत असलेल्या बालकांचे आधार कार्ड बनविण्याबाबत मोहिम (दि.९ फेब्रुवारी, २०१५ ते दि. २८ फेब्रुवारी, २०१५)**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः देहवि-२०१४/प्र.क्र.१०७/का-९**
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ६ **फेब्रुवारी, २०१५**

**प्रस्तावना:-**

भारतीय नागरिकांना सार्वजनिक ओळखपत्र आधार कार्डच्या माध्यमातून देण्याचा उपक्रम केंद्र शासनामार्फत राबविला जात आहे. त्यानुसार आधार कार्ड हे प्रत्येकालाच दैनंदिन व्यवहारात तसेच खाजगी व सार्वजनिक जीवनात उपयुक्त ठरत आहेत. देहविक्री करणा-या महिलांकडे आधार कार्ड मिळविण्यासाठी लागणा-या कागदपत्रांची उपलब्धता नसल्यामुळे त्यांना आधार कार्डच्या लाभापासून वंचित राहावे लागत आहे. ही बाब लक्षात घेऊन देहविक्री करणा-या महिलांना व त्यांच्या सोबत असलेल्या बालकांना आधार कार्ड मिळणेसाठी शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील देहविक्री करणा-या महिलांचे व त्यांच्या सोबत असलेल्या बालकांचे आधार कार्ड बनविण्यासाठी खालीलप्रमाणे नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

१. दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५ ते दि. २८ फेब्रुवारी २०१५ या कालावधीत देहविक्री करणा-या महिलांना आधार कार्ड देण्यासाठी मोहिमेचे आयोजन प्रत्येक जिल्हयातील संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी करावयाचे आहे.
२. जिल्हा पातळीवरील मोहिमेचा शुभारंभ मान्यवरांच्या हस्ते (लोक प्रतिनिधी, वरिष्ठ अधिकारी) करावा.
३. प्रत्येक जिल्हयाच्या, जिल्हा महिला व बाल विकास अधिका-यांनी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था आणि मुंबई जिल्हा एड्स नियंत्रण संस्था यांच्यामार्फत देहविक्री करणा-या महिलांसोबत कार्यरत असलेल्या जिल्हा स्तरावरील संस्था/संघटना यांची बैठक बोलावून सदर महिलांना आधार कार्ड देण्याबाबत शिबिरांची आखणी करावी.
४. शिबिरांचे आयोजन करतांना महिलांच्या सोयीचा दिवस, वेळ आणि स्थळ असेल याची खात्री करावी.

५. महिलांच्या कागदपत्रांच्या संदर्भात येणा-या अडचणी संबंधीत सामाजिक संस्था/संघटना आणि आधार कार्ड देणेसाठी जिल्हापातळीवरील अधिकारी यांच्या सहाय्याने सोडविण्यात याव्यात.

६. जिल्हा व महिला बाल विकास अधिकारी यांनी कागदपत्रांच्या येणा-या अडचणी आणि त्यावर स्थानिक पातळीवर केलेली कार्यवाहींसह शिबिराचा सविस्तर अहवाल दि. ७ मार्च, २०१५ पूर्वी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना त्वरीत पाठवावा.

७. सर्व विभागीय उपआयुक्त (महिला व बाल विकास विभाग) यांना सुचित करण्यात येते की, या कामी आवश्यक ते सहकार्य जिल्हा महिला व बाल विकास अधिका-यांना करावे. तसेच दिनांक २१ मार्च,२०१५ अखेर विभागातील सर्व देहविक्री करणा-या महिलांचे व त्यांच्या बालकांचे आधार कार्ड काढण्यात आले असल्याचे प्रमाणपत्र आयुक्तालयास/शासनास सादर करावे.

८. उपआयुक्त बाल विकास आणि महिला विकास यांनी सदर प्रकरणांत समन्वयाची भुमिका बजावावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१२१२५४१८१९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: CN = Mahendra Babusing Hajari, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Women & Child Development Department
Reason: I am the author of this document
Date: 2015.02.07 17:12:55 +05'30'

**म.बा.हजारी**
**शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री/राज्यमंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
६. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय,मुंबई

७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई
८. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
९. उपसंचालक,UIDAI, विभागीय कार्यालय, ७ वा मजला M. T. N. L. इक्सचेंज,
१०.जी.डी. सोमानी मार्ग, सोमानी हायस्कुल जवळ, कफ परेड, कुलाबा, मुंबई-५
११.जिल्हाधिकारी (सर्व)
१२.विभागीय उपआयुक्त (महिला व बाल विकास) (सर्व)
१३.सर्व, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत )
१४.उपसंचालक, सेंटर फॉर ॲडव्होकेसी ॲन्ड रिसर्च (CFAR),पुणे.
१५.सर्व उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१६.निवड नस्ती कार्यासन-०९